केंद्रीय कोळसा मंत्रालयाद्वारे स्पर्धात्मक निविदाद्वारे वाटप झालेल्या राज्यातील कोळसा खंडाच्या संदर्भात विविध ना-हरकती व परवाने हस्तातरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग
शासन परिपत्रक क्रमांक: एमएनजी-०५०१५/प्र.क्र. ५६/उद्योग-९
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १६ जून, २०१५

**संदर्भ:** सचिव, केंद्रीय कोळसा मंत्रालयाचे अर्धशासकीय पत्र क्र.अ.शा.१३०१६/३६/२०१५-सीऐ-III दिनांक १९ मे, २०१५.

**प्रस्तावना:-**

केंद्रीय कोळसा मंत्रालयाद्वारे द कोल माईन्स (स्पेशल प्रोव्हजन) ॲक्ट २०१५ अन्वये लिलाव पध्दतीद्वारे महाराष्ट्र राज्यात विविध कोळसा खंडाचे वाटप करण्यात येत आहे. सद्यस्थितीत राज्यातील चार कोळसा खंड लिलाव पध्दतीने वाटप करण्यात आल्याचे केंद्रीय कोळसा मंत्रालयाद्वारे विहीतीकरण आदेश (vesting order) निर्गमित करण्यात आलेले आहेत. प्रस्तुत विहीतीकरणाच्या आदेशाच्या अनुषंगाने संबंधित कोळसा खंडांच्या खाणपट्टा मंजूरीची प्रक्रीया राज्य शासनाच्या स्तरावर चालू आहे.

२. महाराष्ट्र राज्यातील लिलावाद्वारे वाटप करण्यात आलेल्या चार कोळसा खाणपट्टाधारकांच्या विविध अडी-अडचणी सोडविण्यासाठी प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षेतेखाली दि.८ जून २०१५ रोजी बैठक घेऊन याबाबत चर्चा करण्यात आली. सदर बैठकीत झालेल्या चर्चेनुसार राज्यातील नव्याने लिलाव पध्दतीद्वारे केंद्रीय कोळसा मंत्रालयाच्या विहितीकरण आदेशाद्वारे वाटप झालेल्या व भविष्यात वाटप होणा-या कोळसा खंडांना विविध वैधानिक परवानग्या व ना-हरकती तातडीने देण्याबाबत विविध यंत्रणेने कार्यवाही करण्याचे निदेश दिले आहेत. तसेच प्रस्तुत विषयी सचिव , केंद्रीय कोळसा मंत्रालय , नवी दिल्ली यांनी त्यांचे दिनांक १९/५/२०१५ च्या अर्धशासकीय पत्राद्वारे राज्यात लिलाव पध्दतीद्वारे वाटप करण्यात आलेल्या कोळसा खंडांना विविध वैधानिक परवानग्या व परवाने तसेच कंन्सेंट टू ऑपरेट -राज्य प्रदुषण नियंत्रण मंडळ , विद्युत पुरवठा, पाणी पुरवठा, तसेच जमिन फेरफारीच्या नोंदीतील बदल इत्यादी, परवानग्या नवीन खाणपट्टाधारकांच्या नावे तातडीने करण्याबाबत विविध यंत्रणांना निर्देश देण्याची विनंती केली आहे.

**शासन परिपत्रक:-**

राज्यातीत विविध कोळसा खंडांच्या वाटपानंतर सदर कोळसा खंडांचे उत्पादन लवकरात लवकर सुरु होण्याच्या दृष्टीने त्यांना आवश्यक विविध ना-हरकती व परवाने तातडीने देण्याबाबत शासन खालील प्रमाणे निर्देश देत आहे.

अ) उद्योग (खनिकर्म) विभागाकडून केंद्रीय कोळसा मंत्रालयाद्वारे निर्गमित राज्यातील विविध कोळसा खंडांचे वाटपाचे अभिहस्तांतरण आदेश (vesting order) महसूल -जिल्हाअधिकारी कार्यलय , वन विभाग, प्रदुषण नियंत्रण मंडळ संचालक, उद्योग, जमाबंधी आयुक्त , व्यवस्थापक महावितरण यांना वेळोवेळी अग्रेषित करण्यात आल्यानंतर त्यांनी पुढील कार्यवाही तात्काळ करावी.

ब) संचालक , भूविज्ञान व खनिकर्म यांनी उपरोक्त कोळसा खंडधारकांकडे शिल्लख असलेला कोळसा वापरासाठी ट्रॉंझीट पासेस देण्याची व्यवस्था करावी.

क) प्रस्तुत कोळसा खंड धारकांना महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाने पूर्वीच्या कोळसा खंडधारकांच्या नावे असलेले कन्सेंट टु ऑपरेट नवीन वाटप झालेल्या धारकाच्या नावे देण्याची कार्यवाही तातडीने करावी.

ड) जमिनीच्या फेरफारी करिता केंद्रीय कोळसा मंत्रालयाकडून MMDR Act १९५६ च्या कलम ५ (१) च्या तरतूदीनुसार खाणपट्टयासाठी मंजूर क्षेत्राचे विस्तृत सर्वे क्रमांक व गट क्रमाक उपलब्ध आहेत. या आधारावर घटक कंपन्यांनी त्यांच्या पूर्वीची कंपनीनी संपादीत केलेल्या खाजगी जमिनीच्या फेरफारीबाबत विहितीकरण आदेशा (vesting order) प्रमाणे संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे प्रस्ताव सादर करावेत, जिल्हाधिकारी कार्यालयाने यांनी विहीतीकरण आदेशा (vesting order) चा आधार घेऊन जमीनीचा फेरफार करण्याची कार्यवाही करावी.

इ) नव्याने कोळसा खंड वाटप झालेल्या घटकांना वन विभागाकडून तातडीने ना हरकत प्रमाणपत्र सुधारित नावाने देण्याची कार्यवाही करावी.

ई) नव्याने कोळसा खंड वाटप झालेल्या घटकांना संबंधित जिल्हाधिकारी यांनी विस्फोटक पध्दार्थ अधिनियम अंतर्गत असलेले ना हरकत प्रमाण पत्र तातडीने देण्याची कार्यवाही करावी.

ए) व्यवस्थापक महावितरण यांनी नव्याने कोळसा खंड वाटप झालेल्या घटकांना सुधारित नावाने विज जोडणी मंजूर करण्याबाबत कार्यवाही करावी.

ऐ) नव्याने कोळसा खंड वाटप झालेल्या घटकांना BT& AL अंतर्गत ना हरकत प्रमाणपत्र देण्याबाबत संचालक, उद्योग संचालनालय यांनी तातडीने कार्यवाही करावी.

वरील प्रमाणे सर्वसंबंधित यंत्रणांनी तातडीने कार्यवाही करुन राज्यात लिलाव पध्दतीने वाटप झालेल्या कोळसा खंडांना लवकरात लवकर उत्पादन सुरु करुन राज्याच्या महसूलात वाढ

होण्यासाठी प्रयत्नशील रहावे. सुलभ संदंर्भासाठी राज्यात लिलाव पध्दतीद्वारे वाटप करण्यात आलेल्या चार कोळसा खंडांचे विहितीकरण आदेश सोबत जोडले आहेत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१७१६१६३१७२१० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sanjay Shankarrao Ingle

Digitally signed by Sanjay Shankarrao Ingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Shankarrao Ingle
Date: 2015.06.17 17:05:24 +05'30'

**( संजय इंगळे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई-३२.

२) प्रधान सचिव (पर्यावरण), पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

३) संचालक तथा विकास आयुक्त, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, पहिला मजला, मुंबई.

४) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, कल्पतरु बिल्डींग, ३ रा मजला, सायन,मुंबई.

५) व्यवस्थापकीय संचालक, महावितरण. प्रकाश गड, एक्सप्रेस हायवेच्या बाजूला, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५०.

६) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, २७, खनिज भवन, सिंमेंट रोड, शिवाजीनगर , नागपूर.

७) जिल्हाधिकारी ,(नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, वर्धा,भंडारा,).

८) कार्यकारी संचालक, मे. कर्नाटक पॉवर कॉर्पोरेशन लि. लं.८२ शक्ती भवन, रेस कोर्स रोड, बंगळूरु-५६०००१.

९) कार्यकारी संचालक, मे सनफ्लॅग आयर्न & स्टील कॉर्पोरेशन लि. नं.३३, माऊँट रोड, सदर , नागपूर-४४०००१.

१०) कार्यकारी संचालक, मे.बी.एस. इस्पात लि. ,ख. नं. ९७,१०१,१९० व्हिलेज सालोरी येनसा, पोस्ट चिनोरा, ता.वरोरा, जि. चंद्रपूर-४४२९१४.

११) कार्यकारी संचालक, मे. इंद्रजित पॉवर प्रा.लि. ४ था मजला, उत्तम हाऊस, ६९ पी.डी मेल्लो रोड, कारनॅक बंदर, मुंबई-४०० ००९.